**कृष्णा मराठवाडा उपसा सिंचन योजना जि. उस्मानाबाद व जि. बीड प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## जलसंपदा विभाग,

शासन निर्णय क्रमांक : कृष्णाम-०७०९/(४३७/२००९) मोप्र-१
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक :- २७/०८/२००९

**वाचा :-** १) शासन निर्णय क्र.२००४/१४१३/(३८/२००४) जसंनि, दि.२३.८.२००७
२) शासन निर्णय क्र.संकीर्ण २००९/२७४/(५३/२००९) जसंनि, दि.७.७.२००९

**प्रस्तावना :-**

कृष्णा मराठवाडा उपसा सिंचन योजना जि. उस्मानाबाद या योजनेस मुळ प्रशासकीय मान्यता एकूण रुपये २३८२.५० लक्ष एवढया रकमेस देण्यात आली होती. त्यानंतर संदर्भीय पत्र क्रमांक (२) नुसार सदर प्रकल्पास सुधारित प्रशासकीय मान्यता प्रस्ताव सादर करण्याबाबत सुचविले होते.

दरम्यानचे काळात दरसुचीतील वाढ, इतर कामे, भूसंपादनाच्या किंमतीत झालेली वाढ, पुनर्वसन इ.कारणांमुळे प्रकल्पाच्या खर्चात बरीच वाढ झाली. नव्याने केलेल्या प्राक्कलनानुसार प्रकल्पाच्या कामासाठी रु. ४८४५.०५ कोटी इतका खर्च येईल असे दिसून आले. त्यामुळे कृष्णा मराठवाडा उपसा सिंचन योजना जि.उस्मानाबाद व जिल्हा बीड या योजनेस प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

(१) कृष्णा मराठवाडा उपसा सिंचन योजना जि.उस्मानाबाद व जि.बीड या योजनेचा एकूण अंदाजित किंमत सन २००८-०९ च्या दरसुचीवर आधारित रुपये ४८४५.०५ कोटी (रुपये चार हजार आठशे पंचेचाळीस कोटी पाच लक्ष फक्त) रुपये ४२२०.२० कोटी (रुपये चार हजार दोनशे वीस कोटी व वीस लक्ष फक्त) कामाप्रित्यर्थ आणि रुपये ६२४.८५ कोटी (रुपये सहाशे चोवीस कोटी व पंच्याऐंशी लक्ष फक्त) अनुषंगिक खर्च यास प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

(२) सदर प्रकल्पाचे काम नियोजित वेळेत व सुधारित प्रशासकीय प्रस्तावाच्या तरतुदीच्या मर्यादेत पूर्ण करणेत यावे.

(३) या प्रकल्पामुळे उस्मानाबाद जिल्हयातील ८७,१८८ हेक्टर व बीड जिल्हयातील २७,५४३ हेक्टर अवर्षणप्रवण क्षेत्रातील क्षेत्रास सिंचनाचा लाभ होणार आहे. प्रकल्पाचे लाभव्यय गुणोत्तर १.२५ इतके आहे.

(४) या कामावरील खर्च मागणी क्रमांक आय-५, लेखाशिर्ष ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च १९०-सार्वजनिक व इतर उपक्रमामती गुंतवणूक (२) योजनांअंतर्गत (२) (३) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (४७०१ एच ७५४) (दत्तमत) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व त्याखालील मंजूर अंशदानातून भागविण्यात यावा.

(५) तसेच सदरील सुधारीत प्रशासकीय मान्यतेप्रमाणे एकूण २३.६६ अ.घ.फु. करिता रु. ४८४५.०५ कोटी रक्कमेस मान्यता देण्यात येत असली तरी प्रत्यक्ष काम प्रथम टप्प्यातील कामापुरते म्हणजे ७ अ.घ.फु. व खर्च रुपये २३४९.१० कोटी पर्यंत मर्यादीत ठेवावा व तेवढीच कामे हाती घेण्यात यावीत. त्यापुढील कामे घेताना शासनाची पुनः मान्यता घ्यावी. त्याचा तपशील खालीलप्रमाणे मान्य करण्यात येत आहे.

| अ.क्र. | उपसा सिंचन योजना | प्रथम टप्पा (७ अ. घ. फु.) | द्वितीय टप्पा (१६.६६ अ. घ. फु.) | एकूण रुपये कोटीत |
|---|---|---|---|---|
| १. | उपसा सिंचन योजना क्र. १ (३.०८ अ. घ. फु.) | ११८६.४१ | ९२५.२४ | २१११.६५ |
| २. | उपसा सिंचन योजना क्र. २ (२.२४ अ. घ. फु.) | ६३०.८० | ५६१.२८ | ११९२.०८ |
| ३. | आष्टी उपसा सिंचन योजना क्र. ३ (१.६८ अ. घ. फु.) | ५३१.८९ | ३७४.९७ | ९०६.८६ |
| | **एकूण** | **२३४९.१०** | **१८६१.४९** | **४२१०.५९** |

(६) प्रकल्पाची सुधारित किंमत अर्थसंकल्पीय अधिवेशामध्ये विधानमंडळाच्या निदर्शनास आणण्याची कार्यवाही स्वतंत्रपणे करण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक **२००९०८२७१९२९५२००१** असा आहे.

**महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

सोबत : परिशिष्ट अ, ब, व क

**( व्यं. वि. गायकवाड )**
सचिव (जलसंपदा)

प्रत सहपत्रासह :-

महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
स्वीय सहायक, मा.मुख्यमंत्री महाराष्ट्र राज्य मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, मा. उपमुख्यमंत्री महाराष्ट्र राज्य मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, मा.मंत्री जलसंपदा (कृ.खो.वि.म.वगळून) मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, मा.मंत्री जलसंपदा (कृ.खो.वि.म.) मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, मा.राज्यमंत्री (जलसंपदा), मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, सचिव (जलसंपदा)/ (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद
कार्यकारी संचालक, कृष्णा खोरे विकास महामंडळ, पुणे
मुख्य अभियंता (दवप्र) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता (कृपातंल) व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
मुख्य अभियंता (विप्र) जलसंपदा विभाग, पुणे

मुख्य अभियंता, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद
आंतरवित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उप सचिव (मोप्र-१), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उप सचिव (जसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
उपसंचालक, माहिती व जनसंपर्क, संचालनालय, मंत्रालय, मुंबई यांना व योग्य त्या प्रसिध्दीसाठी (२ प्रती)
अधीक्षक अभियंता, उस्मानाबाद पाटबंधारे प्रकल्प मंडळ, उस्मानाबाद
अधीक्षक अभियंता, पुणे पाटबंधारे प्रकल्प मंडळ, पुणे
अधीक्षक अभियंता, कृष्णा पाणी तंटा लवाद, पुणे
कार्यकारी अभियंता, पाटबंधारे सर्वेक्षण व अन्वेक्षण विभाग, उस्मानाबाद
अवर सचिव (मोप्र-१) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
जिल्हाधिकारी, जि.उस्मानाबाद व जि.बीड
उप अभियंता, (मोप्र-१), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
**कार्यासन :-** निवसं-१ / अर्थसंकल्प-१ / अर्थसंकल्प-२ / लाक्षेवि(कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
मोप्र-१ कार्यासन, संग्रहार्थ / मोप्र-१ कार्यासन, निवडनस्ती.